**अधिव्याख्याता, महाराष्ट्र शिक्षण सेवा,गट-ब (शिक्षण सक्षमीकरण शाखा) पदावर सरळसेवेने रूजू झालेल्या अधिकाऱ्यांची महसूल विभाग संवर्ग नियमातील तरतुदीनुसार पती-पत्नी एकत्रिकरणांतर्गत विभागीय संवर्ग बदलून देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : विसब-४८१८/प्र. क्र.२४८/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- १५ फेब्रुवारी, २०१९

वाचा:-१) सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना क्रमांक : एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/कार्या-१२, दिनांक २८ एप्रिल, २०१५
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन आदेश क्रमांक : ससेप्र-४४१७/प्र. क्र. ४४/प्रशा-२, दिनांक ४ ऑगस्ट, २०१७.

शासन निर्णय-

महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (शिक्षण सक्षमीकरण शाखा) मधील अधिव्याख्याता, जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था या संवर्गातील सरळसेवेच्या पदावर संदर्भाधीन दिनांक ४ ऑगस्ट, २०१७ च्या पत्रान्वये नियुक्ती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांपैकी खाली नमूद केलेल्या ६ अधिकाऱ्यांना सदर पदावर रूजू झालेल्या दिनांकापासून एक वर्षाचा कालावधी पूर्ण झालेला असल्याने महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०१५ मधील नियम-१२ (ब) अनुसार सदर अधिकाऱ्यांनी पती-पत्नी एकत्रिकरणांतर्गत महसूल विभाग बदलून मिळण्यासाठी विनंती केली आहे.

२. सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २८.०४.२०१५ रोजीच्या अधिसूचनेमधील नियम १२ मधील तरतुदीनुसार वाटप करण्यात आलेल्या विभागात किमान एक वर्ष सेवा पूर्ण केल्यानंतरच नमूद केलेल्या कारणास्तव संबंधित अधिकाऱ्यांस दुसरा महसुली विभाग बदलून देता येतो. सदर अधिकाऱ्यांच्या विनंतीच्या अनुषंगाने महसुल विभाग बदलून पदस्थापना देण्यासाठी त्यांचे विनंती अर्ज नागरी सेवा मंडळाच्या दिनांक १३.११.२०१८ रोजीच्या बैठकीत ठेवण्यात आले होते. नागरी सेवा मंडळाच्या शिफारशींच्या अनुषंगाने सक्षम प्राधिकारी लगतच्या वरिष्ठ प्राधिकाऱ्यांच्या पूर्वमान्यतेने खालील तक्त्यातील (६) अधिकाऱ्यांना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक ६ मध्ये दर्शविलेल्या महसुली विभागामध्ये व स्तंभ क्रमांक ७ मध्ये दर्शविलेल्या पदावर बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याच्या पदावर रूजू झाल्याचा दिनांक | सरळसेवा नियुक्तीने वाटप केलेला महसुली विभाग | सध्याचे कार्यरत ठिकाण | बदलीनंतरचा विभाग व जिल्हा | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | महसूली विभाग | जिल्हा |
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) |
| १. | श्री. अनिल संतराम जाधव, | ९.०८.२०१७ | नागपूर | अधिव्याख्याता, गडचिरोली | औरंगाबाद | परभणी |
| २. | श्री. शिवाजी शामसुंदर साखरे | २२.०८.२०१७ | कोंकण | अधिव्याख्याता, ठाणे | औरंगाबाद | जालना |
| ३. | श्रीमती सुचित्रा देवराव जाधव | २४.०८.२०१७ | नागपूर | अधिव्याख्याता, गोंदिया | औरंगाबाद | उस्मानाबाद |
| ४. | श्री. पांडुरंग रामकृष्ण चव्हाण | २४.०८.२०१७ | नागपूर | अधिव्याख्याता, गडचिरोली | औरंगाबाद | औरंगाबाद |
| ५. | श्री. रामेश्वर भगवान लोटके | १.०९.२०१७ | अमरावती | अधिव्याख्याता, यवतमाळ | नाशिक | अहमदनगर |
| ६. | श्रीमती शितल सुभाषराव शिंदे | १०.०८.२०१७ | नागपूर | अधिव्याख्याता, भंडारा | औरंगाबाद | हिंगोली |

३. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्विकारावा. तसेच आयुक्त (शिक्षण), पुणे यांनी संदर्भाधीन आदेशात नमूद केल्याप्रमाणे सदर अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना तातडीने कळवावे व बदली झालेले अधिकारी विहित कालावधीत दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होतील याची खातरजमा करावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०१९०२१६१२४९४२९०२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh Basaveshwar Mamadapure

Digitally signed by Santosh Basaveshwar Mamadapure
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3bfe111652996d95372924b1d22cdf88b33dfa2a3de3d8ea011b7d83adc40cb6, serialNumber=557abe7a7194ec5ddc74df537d7d57a9dbda20b1937a2e41983c35f6a38b6ad8, cn=Santosh Basaveshwar Mamadapure
Date: 2019.02.16 12:56:02 +05'30'

**(संतोष ममदापुरे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त, शिक्षण,महाराष्ट्र राज्य,पुणे
२) सर्व संचालक
३) महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १, मुंबई
४) महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र २, नागपूर

५) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई

६) संबंधित प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था,

७) संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालक,

८) संबंधित जिल्ह्याचे शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक / निरंतर),

९) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,

१०) संबंधित अधिकारी (शिक्षण आयुक्तालयामार्फत)

**प्रत माहितीस्तव :-**

१) मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई

२) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक

३) निवडनस्ती/ प्रशा-२ कार्यासन